शालेय शिक्षण व क्रीडा (खुद्द) विभागासाठी आवश्यक संगणकाचे सुटे भाग खरेदी करण्यासाठी पुरवठादाराची नियुक्ती करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : खरेदी-२०२१/प्र.क्र.२०/नोंदणी शाखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २० डिसेंबर, २०२१

संदर्भ : १. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/-भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६

२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/-उद्योग-४, दिनांक २४ डिसेंबर, २०१७

३. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०२१/प्र.क्र.८/-उद्योग-४, दिनांक ७ मे, २०२१

४. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची क्रमांक : खरेदी-२०२१/प्र.क्र.२०/नोंदणी शाखा, दिनांक १० नोव्हेंबर, २०२१ रोजीची दरपत्रक सूचना

**शासन आदेश :-**

शालेय शिक्षण व क्रीडा (खुद्द) विभागाकरिता आवश्यक असणारे संगणकाचे सुटे भाग खरेदी करण्यासाठी पुरवठादारासोबत एक वर्षाचा करार करण्याकरिता दिनांक १० नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या सूचनेद्वारे दरकरार मागविण्यात आले होते. त्यानुसार एकूण ७ निविदा प्राप्त झाल्या. सदर ७ दरकरारांपैकी, कार्ट्रेजसाठी अपेक्स एण्टरप्रायजेस यांनी सादर केलेले दर सर्वात कमी आहेत. तसेच सॅनडीस्क (३२ GB) या कंपनीचा पेनड्राइव्ह आणि Iball कंपनीचा कि बोर्ड व माऊस या वस्तूंचे नागनेची स्टेशनरी, फोर्ट, मुंबई यांनी सर्वात कमी दर सादर केले आहेत. सबब, दिनांक २४ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या खरेदी समितीच्या बैठकीत अपेक्स एण्टरप्रायजेस व नागनेची स्टेशनरी, फोर्ट, मुंबई या दोन पुरवठादारांची निवड खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

१. विभागासाठी आवश्यक असणारे संगणकाचे सुटे भाग खरेदी करण्याचा कालावधी दिनांक १.१२.२०२१ ते दिनांक ३०.११.२०२२ इतका राहील.

२. विभागामार्फत वेळोवेळी नोंदविलेल्या मागणीनुसार व निविदेमध्ये नमूद केलेल्या कंपनीचे अथवा त्यापेक्षा चांगल्या दर्जाचे संगणकाच्या सुट्या भागाचा पुरवठा दरपत्रकात नमूद केलेल्या दराने तातडीने पुरवणे बंधनकारक असेल.

३. यादीमध्ये नमूद केलेल्या कंपनीव्यतिरिक्त इतर कंपनीचे संगणकाचे सुटे भागाची मागणी केल्यास ते तातडीने पुरवणे बंधनकारक असेल. तसेच अशा वस्तू बाजारभावाच्या किंमतीपेक्षा ५% कमी दराने पुरवठा करणे पुरवठादारास बंधनकारक राहील.

२. या संदर्भात अपेक्स एण्टरप्रायजेस व नागनेची स्टेशनरी, फोर्ट, मुंबई या संस्थेसोबत १०० रुपयांच्या मुद्रांक कागदावर (Stamp paper) करारनामा करण्यात यावा.

३. हे शासन आदेश, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग एक, उपविभाग दोन, अनुक्रमांक १, नियम २ व ७ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासननिर्णय, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५ व दिनांक ७ मे, २०२१ मधील विहित अटी व शर्तींचे पालन करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२११२२०१५१८०१७४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Basaveshwar Mamadapure

Digitally signed by Santosh Basaveshwar Mamadapure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, serialNumber=557abe7a7194ec5ddc74df537d7d57a9dbda20b1937a2e41983c35f6a38b6ad8, cn=Santosh Basaveshwar Mamadapure
Date: 2021.12.20 15:19:08 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सर्व सह सचिव / उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे कार्यालय, मुंबई
५. अपेक्स एण्टरप्रायजेस, शॉप नं. ३, ६१ बोरा बझार स्ट्रीट, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
६. नागनेची स्टेशनरी, त्रिपाठी इमारत, तळ मजला २४५, बझार गेट स्ट्रीट, फोर्ट, मुंबई- ४०० ००१
७. निवड नस्ती / नोंदणी शाखा.